निवड मंडळाकडून उमेदवार उपलब्ध होत नाहीत म्हणून नियुक्ती प्राधिका-यांनी मागणीपत्र रद्द करून त्यांच्या स्तरावर पदे भरण्याची कार्यवाही न करण्याबाबत.....

महाराष्ट्र शासन
सामान्य प्रशासन विभाग,
शासन परिपत्रक, क्रमांकः प्रानिमं-2795/प्र.क्र.73/95/13-अ,
मंत्रालय, मुंबई-400 032, दिनांक 19 सप्टेंबर, 1995.

वाचा :- (1) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांकः प्रानिमं 1286/प्र.क्र.86(1)/13-अ, दिनांक 9 फेब्रुवारी, 1988.

(2) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांकः प्रानिमं-1288/प्र.क्र.26/88/13-अ, दिनांक 2 मे, 1988.

## शासन परिपत्रक

विधानसभा आचारसंहितेचा एक भाग म्हणून तसेच निवड मंडळाच्या कामकाजाबाबत तक्रारी आल्याने नवीन शासन सत्तेवर आल्यानंतर दिनांक 27 मार्च, 1995 पासून निवड मंडळाची उमेदवार निवडीची सर्व प्रकारची निवड प्रक्रिया स्थगित करण्यात आली आहे. परिणामी निवड मंडळाचे उमेदवार निवडीचे काम गेल्या 7-8 महिन्यांपासून स्थगित आहे. नियुक्ती अधिका-याकडून विविध संवर्गांचे उमेदवार उपलब्ध करून देण्याबाबत निवड मंडळाकडे मागणी आली आहे. परंतु स्थगितीमुळे नियुक्ती अधिका-याकडे निवड मंडळास उमेदवारांची शिफारस करता येत नाही. शासनाच्या असे निदर्शनास आले आहे की, निवड मंडळाकडून उमेदवार प्राप्त होत नाहीत हे लक्षात घेऊन काही नियुक्ती अधिकारी निवड मंडळाकडे पाठविलेले मागणीपत्र रद्द करण्याबाबत कळवित आहेत, तसेच निवड मंडळाकडून उमेदवार मागवून सरळ सेवा भरतीने भरावयाची पदे अन्य मार्गाने भरण्याची कार्यवाही करीत आहेत. नियुक्ती अधिका-यांची सदर कार्यवाही गैर असून शासनाच्या धोरणाच्या विरुध्द आहे.

2. प्रकल्पग्रस्त, स्वातंत्र्य सैनिक, अनुकंपा तत्वावर करावयाच्या नेमणुका निवड मंडळाच्या कक्षेतून वगळून विहित कोटयाप्रमाणे ह्या नेमणुका करण्याचे अधिकार नियुक्ती अधिकारी यांना देण्यात आलेले आहेत. त्यानुसार विहित कोटयानुसार नेमणुका करून उर्वरीत सरळसेवा भरतीने भरावयाची पदे भरण्याकरिता निवड मंडळाकडे मागणीपत्र पाठविले जाते. परंतु सद्यस्थितीत निवड मंडळाकडून उमेदवार उपलब्ध होत नाहीत हे पाहून निवड मंडळाकडे पाठविलेले मागणीपत्र रद्द करण्याबाबत निवडमंडळास कळवून नियुक्ती अधिकारी प्रकल्पग्रस्त व्यक्ती अथवा त्यांच्यावर अवलंबून असलेल्या व्यक्ती तसेच स्वातंत्र्य सैनिक किंवा त्यांनी नामनिर्देशित केलेल्या व्यक्तींच्या सरसकट नेमणुका करणे योग्य होणार नाही. तरी रिक्त पदे भरण्याकरिता निवड मंडळाकडे पाठविलेली मागणीपत्रे रद्द करू नयेत. तसेच सदर रिक्त पदे परस्पर अन्य मार्गाने भरण्याची कृती करू नये असे आदेश देण्यात येत आहेत.

3. निवड मंडळाकडे रिक्त पदे भरण्याकरिता उमेदवार उपलब्ध करून देण्याबाबत मागणी केलेली पदे प्रशासकीय/कामाच्या दृष्टीने निवड मंडळाकडून उमेदवार उपलब्ध होईपर्यन्त रिक्त ठेवणे शक्य होत नसल्यास सदर पदे शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांकः प्रानिमं 1290/प्र.क्र.31/90/13-अ, दिनांक 14 ऑगस्ट, 1990 व शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांकः प्रानिमं 1990/1340/13-अ, दिनांक 16 नोव्हेंबर, 1993 मधील सूचनांनुसार निव्वळ तात्पुरत्या स्वरूपात सहा-सहा महिन्यांच्या कालावधीकरिता भरावीत. संबंधितांच्या सेवेत तांत्रिक खंड देवून त्या पुढे चालू ठेवाव्यात. निवड मंडळ पुरस्कृत उमेदवार प्राप्त झाल्यावर तात्पुरत्या नेमणुका तत्काळ समाप्त करण्यात याव्यात.

GR 200406183314001-0100

सर्व मंत्रालयीन विभागांस विनंती करण्यात येते की, त्यांच्या अधिपत्याखालील सर्व विभाग प्रमुख, कार्यालय प्रमुख, नियुक्ती अधिकारी यांना सदर आदेशाचे पालन करण्याबाबत तात्काळ सूचना द्याव्यात.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

रा. द. कासार,
उप सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति,

राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई,
मुख्य मंत्र्यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई,
सर्व मंत्री/राज्यमंत्री यांचे स्वीय सहायक (राज्यमंत्री, सामान्य प्रशासन वगळून),
महालेखापाल, महाराष्ट्र-1/2, (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर,
महालेखापाल, महाराष्ट्र-1/2, (लेखा परीक्षा), मुंबई/नागपूर,
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
* प्रबंधक, उच्च न्यायालय, मूळ न्याय शाखा, मुंबई,
* प्रबंधक, उच्च न्यायालय, अपील शाखा, मुंबई,
* प्रबंधक, लोक आयुक्त/उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई,
* सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधान भवन, मुंबई,
* सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
सर्व विभागीय आयुक्त,
सर्व जिल्हाधिकारी,
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
सर्व मंत्रालयीन विभाग,
सर्व मंत्रालयीन विभागांच्या नियंत्रणाखालील विभाग प्रमुख / कार्यालय प्रमुख,
सदस्य सचिव, महाराष्ट्र दुय्यम सेवा निवड मंडळ, मुंबई,
सर्व प्रादेशिक दुय्यम सेवा निवड मंडळे,
सर्व नगरपालिकांचे मुख्य अधिकारी,
सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने,
निवड नस्ती.

---

* पत्राने.